**सहाय्यक प्राध्यापक, गणित, शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ (क) या पदावरील नियुक्तीचे आदेश रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१४/प्र.क्र.(१०९/२०१३)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -:०३ एप्रिल, २०१७

<u>पहा</u> : शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१४/प्र.क्र.(१०९/२०१३), दि. ०५/१२/२०१५

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार सहाय्यक प्राध्यापक, गणित शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ (कनिष्ठ) या पदावर श्री. सय्यद शोएब रशीद यांची शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर येथे संदर्भाधीन आदेशाद्वारे ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्वीकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री. सय्यद यांनी आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत म्हणजेच दि. ०५.०१.२०१६ पर्यंत रूजू होणे अभिप्रेत होते. तथापि, श्री. सय्यद यांना उपरोक्त पदावर रुजू होण्यासाठी त्यांच्या दि. २१.१२.२०१५ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार प्रथमत: दि. १४/०१/२०१६ च्या पत्रान्वये दिनांक ०४/०३/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर देखील श्री. सय्यद हे सदर पदावर रूजू झाले नाहीत. त्यामुळे दि. ३०/११/२०१६ च्या पत्रान्वये सदर पदावर रुजू होण्याकरीता शेवटची संधी म्हणून श्री. सय्यद यांना दिनांक ०९/१२/२०१६ पर्यत अंतिम मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि ते नियुक्तीच्या पदावर अद्यापही रुजू झालेले नाहीत. यावरुन त्यांना नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याचे सकृतदर्शनी दिसून येते. त्यामुळे श्री. सय्यद यांच्या सदर पदावरील नियुक्तीबाबतचे आदेश रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

श्री. सय्यद शोएब रशीद यांची सहाय्यक प्राध्यापक, गणित, या पदावर शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर येथे संदर्भाधीन आदेशान्वये करण्यात आलेली नियुक्ती या आदेशाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

०७.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०३१६०४३१०००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.04.03 16:05:47 +05'30'

( सुधिर ज. शेट्टी )
कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

श्री. सय्यद शोएब रशीद, २११, गणेशखिंड रोड, खैरवाडी, मारुती मंदिर समोर, पुणे- ४११ ०१६

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, नागपूर.
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२ नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर .
९. निवड नस्ती/तांशि-१.